**राज्यातील तीर्थक्षेत्र, पर्यटनस्थळ -- परिसर विकास आराखडा अंतिम करणे व अंमलबजावणीसाठी धोरण/मार्गदर्शक तत्वे निश्चित करण्याबाबत......**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०१५/प्र.क्र.६/का-१४४४**

हुतात्मा राजगुरु चौक,मादाम कामा रोड
मंत्रालय,मुंबई-४००० ०३२
तारीख: ४ जून, २०१५

**प्रस्तावना :**

नियोजन विभागाकडे अर्थसंकल्पीय भाषणात नमूद केलेले तीर्थक्षेत्र / पर्यटनस्थळ परिसर विकासाचे मोठे आराखडे अंमलबजावणीकरिता सोपविण्यात आले आहेत. अशा प्रकारच्या आराखड्यांच्या अंमलबजावणीकरिता नियोजन विभागाकडे आवश्यक ती कार्यान्वयीन यंत्रणा नसल्यामुळे आराखड्यांना मान्यता दिल्यानंतर त्यांची अंमलबजावणी विभागीय आयुक्त/ जिल्हाधिकारी यंत्रणेकडून करण्यात अनेक अडचणी निर्माण होतात. परिणामत: आराखडे विहित मुदतीत पूर्ण करणे शक्य होत नाही. तसेच कालावधी वाढल्यामुळे आराखड्यांच्या मूळ किंमतीतही अनाठायी वाढ होऊन, प्रकल्पाचा खर्च वाढतो. सबब, खुद्द नियोजन विभागास नेमून दिलेल्या कामकाजासाठीच्या नियतव्ययातून उपरोक्त आराखडयांवर जास्त प्रमाणात निधी खर्ची पडतो.

राज्यातील अ-वर्ग, ब-वर्ग, व क-वर्ग तीर्थस्थळे, विविध पर्यटनस्थळे, स्मारके इ. ठिकाणचा विकास करण्यासाठी ग्राम विकास व जलसंधारण विभाग, नगर विकास विभाग, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागामार्फत राज्यस्तर योजनांतर्गत तसेच, जिल्हा वार्षिक योजनांमधून देखील आराखड्यांवर खर्च केला जातो. राज्यातील 'अ वर्ग' तीर्थस्थळे 'ब वर्ग' तीर्थस्थळे इ. बाबतीत नगर विकास व ग्राम विकास विभागाकडून कार्यवाही करण्यात येत आहे. तसेच पर्यटनस्थळांबाबत पर्यटन विभागांकडून कार्यवाही करण्यात येते. राज्यातील काही परिसर विकासाचे आराखडे प्राधिकरणांमार्फत देखील राबविण्यात येत आहेत.

२. तथापि, आंतरराष्ट्रीय/ राष्ट्रीय दर्जाची राज्यातील महत्वाची स्थळे व तीर्थक्षेत्रे तसेच नागरी व ग्रामीण क्षेत्रातील तीर्थक्षेत्रे व पर्यटन स्थळे व परिसर विकास आराखडे याबाबतचे प्रस्ताव नियोजन विभागाकडे प्राप्त होत आहेत.

३. उपरोक्त बाबी साकल्याने विचारात घेता, वरीलप्रमाणे विभागांनी राज्यातील तीर्थक्षेत्र/पर्यटन स्थळ विकास आराखड्यांची अंमलबजावणी सुयोग्यरित्या व एकसंघरित्या करण्यासाठी सुनिश्चित धोरण आखण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. तसेच, राज्यातील तीर्थक्षेत्र/पर्यटन स्थळ विकास आराखडयांचे स्वरुप व व्याप्ती विचारात घेऊन नागरी व ग्रामीण क्षेत्रातील तीर्थक्षेत्र परिसर विकासाचे आराखडे व पर्यटन स्थळे विकसित करण्याबाबतचे आराखडे संबंधित नगर विकास, ग्राम विकास व पर्यटन विभागामार्फतच राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## शासन निर्णय:-

उपरोक्त पार्श्वभूमीवर राज्यांतर्गत तीर्थक्षेत्र/पर्यटन स्थळ - परीसर विकास आराखडे तयार करण्याकरिता मंत्रीमंडळाच्या मान्यतेने पुढीलप्रमाणे कार्यपध्दती ठरविण्यात येत आहे. त्यानुसार राज्यस्तरीय शिखर समिती, उच्चाधिकार समिती, जिल्हास्तरीय समिती व जिल्हास्तरीय कार्यकारी समिती खालीलप्रमाणे गठीत करण्यात येत आहेत.

**अ)** राज्यांतर्गत तीर्थक्षेत्र व पर्यटनस्थळ विकास आराखडयांच्या बाबतीत आराखडयांचे महत्त्व व व्याप्ती लक्षात घेता व या कामासाठी केंद्र सरकारकडून अधिक निधी प्राप्त करुन घेण्याच्या दृष्टीने आराखडयास अंतिम मान्यता देण्यासाठी राज्यस्तरीय शिखर समिती गठीत करण्यात येत आहे.

**शिखर समिती**

| अ.क्र. | मान्यवर पदाधिकारी | पदनाम |
|---|---|---|
| १ | मा.मुख्यमंत्री | अध्यक्ष |
| २ | मा.मंत्री, वित्त, नियोजन | उपाध्यक्ष |
| ३ | मा.राज्यमंत्री, वित्त व नियोजन | सदस्य |
| ४ | संबंधित जिल्हयाचे मा.पालकमंत्री | सदस्य |
| ५ | अध्यक्षांच्या शिफारशीने आराखडयाशी संबंधित विभागाचे मा.मंत्री | सदस्य |
| ६ | अध्यक्षांच्या शिफारशीने संबंधित जिल्हयातील मा. संसद सदस्य/ विधान सभा/विधान परिषद सदस्य | सदस्य |
| ७ | संबंधित महानगरपालिका यांचे महापौर / नगरपालिका यांचे नगराध्यक्ष | सदस्य |
| ८ | संबंधित जिल्हापरिषदेचे मा. अध्यक्ष | सदस्य |
| ९ | मुख्य सचिव | सदस्य |
| १० | अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव (वित्त) | सदस्य |
| ११ | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव/ सचिव ( नियोजन विभाग) | सदस्य |
| १२ | आराखडयाशी संबंधित विभागांचे अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव | सदस्य |

| अ.क्र. | मान्यवर पदाधिकारी | पदनाम |
|---|---|---|
| १३ | पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य | सदस्य |
| १४ | संबंधित रेल्वेचे महाव्यवस्थापक | सदस्य |
| १५ | संबंधित विभागीय आयुक्त | सदस्य |
| १६ | संबंधित जिल्हाधिकारी | सदस्य |
| १७ | संबंधित विभागाचे प्रधान सचिव / सचिव | सदस्य सचिव |

**<u>समितीची कार्यकक्षा :-</u>**

१. नियोजित आराखडा व त्यासाठी लागणाऱ्या खर्चास मंजूरी देणे.

२. आराखडयाच्या अंमलबजावणीचा वेळोवेळी आढावा घेणे.

**ब)** जिल्हास्तरीय कार्यकारी समितीने सादर केलेला आराखडा अंतिम करुन तो शिखर समितीकडे सादर करण्यासाठी खालीलप्रमाणे उच्चाधिकार समिती गठीत करण्यात येत आहे.

**<u>उच्चाधिकार समिती</u>**

| अ.क्र. | मान्यवर पदाधिकारी | पदनाम |
|---|---|---|
| १ | मुख्य सचिव | अध्यक्ष |
| २ | अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव (वित्त) | सदस्य |
| ३ | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव/ सचिव ( नियोजन) | सदस्य |
| ४ | आराखडयाशी संबधित विभागांचे अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव | सदस्य |
| ५ | पोलीस महासंचालक | सदस्य |
| ६ | संबंधित रेल्वेचे महाव्यवस्थापक | सदस्य |
| ७ | संबंधित विभागीय आयुक्त | सदस्य |
| ८ | आयुक्त / मुख्याधिकारी, महानगरपालिका / नगरपालिका | सदस्य |
| ९ | संबंधित जिल्हाधिकारी | सदस्य |
| १० | संबंधित विभागाचे सह सचिव/उप सचिव | सदस्य सचिव |

**<u>समितीची कार्यकक्षा :</u>**

१. विकास आराखड्यास शिखर समितीची मान्यता घेण्यासाठी छाननी करुन शिफारस करणे.

२. विकास आराखड्याच्या अनुषंगाने घ्यावयाच्या कामांच्या प्रस्तावांना व खर्चास मान्यता देणे.

३.शिखर समितीने मान्य केलेल्या प्रस्तावांना व खर्चास सुधारित प्रशासकीय मान्यता देणे.

४. विकास आराखड्याच्या अनुषंगाने घ्यावयाच्या कामांचा वेळोवेळी आढावा घेणे.

५. सर्व संबंधित प्रशासकीय विभाग, केंद्र शासनाचे प्रशासकीय विभाग यांचेशी वेळोवेळी समन्वय साधून कामाच्या प्रगतीमध्ये येणाऱ्या अडी-अडचणी सोडविणे, संबंधितांना मार्गदर्शन करणे .

६. बैठकीसाठी आवश्यकतेनुसार कोणत्याही विभागाच्या अधिकाऱ्यास बोलविण्याचे अधिकार समितीस राहतील.

७. प्रकल्पाची अंमलबजावणी विहित कालमर्यादेत पूर्ण होईल याकरिता आवश्यक त्या सर्व उपाययोजना करणे.

**क)** विकास आराखड्याच्या नियोजनासाठी मा.पालकमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे जिल्हास्तरीय समिती गठीत करण्यात येत आहे.

## जिल्हास्तरीय समिती

| अ.क्र. | मान्यवर पदाधिकारी | पदनाम |
|---|---|---|
| १ | संबंधित जिल्हयाचे मा.पालकमंत्री | अध्यक्ष |
| २ | जिल्हयातील मा. संसद सदस्य | सदस्य |
| ३ | जिल्हयातील मा. विधानसभा/विधानपरिषद सदस्य | सदस्य |
| ४ | विभागीय आयुक्त | सदस्य |
| ५ | आयुक्त,महानगरपालिका/मुख्याधिकारी, नगरपालिका | सदस्य |
| ६ | संबंधित जिल्हयाचे पोलीस आयुक्त/पोलीस अधिक्षक | सदस्य |
| ७ | संबंधित रेल्वेचे व्यवस्थापक | सदस्य |
| ८ | प्रादेशिक परिवहन अधिकारी | सदस्य |
| ९ | महाराष्ट्र राज्य विद्यूत वितरण कंपनीचे संबंधित अधिकारी | सदस्य |
| १० | विभागीय व्यवस्थापक, एसटी महामहामंडळ | सदस्य |
| ११ | जिल्हाधिकारी | सदस्य सचिव |

**<u>समितीची कार्यकक्षा:</u>**

१) शिखर समितीने मंजूर केलेल्या आराखडयातील कामांच्या प्रगतीचा त्रैमासिक आढावा घेणे.

२) विकास आराखड्याच्या किंमतीच्या मर्यादेत, सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या किंमतीच्या मर्यादेत कोणताही बदल न करता, आराखडयातंर्गत इतर कामांकरिता मंजूर निधीच्या अंतर्गत समायोजन करण्याचे अधिकार असतील.

३) आराखडयाच्या नियोजित खर्चाच्या प्रशासकीय मान्यतेच्या १०% पर्यंत अतिरिक्त खर्च होत असेल तर, त्याची कारणमिमांसा करुन योग्य असल्यास मान्यता देणे.

**ड**) स्थानिक पातळीवरील सर्व संबंधितांशी चर्चा करुन विकास आराखडा व त्यास लागणारा निधी याचा आराखडा तयार करणे व आराखडयास शिखर समितीची मान्यता मिळाल्यानंतर अंमलबजावणी करण्यासाठी संबंधित जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे कार्यकारी समिती गठीत करण्यात येत आहे.

**जिल्हास्तरीय कार्यकारी समिती**

| अ.क्र. | मान्यवर | पदनाम |
|---|---|---|
| १ | जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| २ | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | सदस्य |
| ३ | आयुक्त,महानगरपालिका / नगरपालिका, मुख्याधिकारी, | सदस्य |
| ४ | संबंधित पोलीस अधिक्षक/पोलीस आयुक्त | सदस्य |
| ५ | अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग | सदस्य |
| ६ | अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधीकरण | सदस्य |
| ७ | अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र राज्य विज वितरण कंपनी मर्यादित | सदस्य |
| ८ | प्रादेशिक परिवहन अधिकारी | सदस्य |
| ९ | सहसंचालक, नगर रचना | सदस्य |
| १० | प्रादेशिक व्यवस्थापक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ | सदस्य |
| ११ | आराखडयाशी संबंधित यंत्रणेचे इतर जिल्हा प्रमुख | सदस्य |
| १२ | आराखडयाशी संबंधित विशेष निमंत्रीत | सदस्य |
| १३ | जिल्हा नियोजन अधिकारी | सदस्य सचिव |

<u>समितीची कार्यकक्षा</u>

१) विकास आराखडा यशस्वीरितीने पार पाडण्यासाठी नियोजन आराखडा तयार करणे.

२) विकास आराखडा व अंदाजपत्रक संबंधित सक्षम कार्यान्वयीन यंत्रणेच्या तांत्रिक छाननीसह तयार करणे.

३) कामांसाठी आवश्यकतेनुसार उच्चाधिकार समितीच्या मान्यतेने प्रकल्प सल्लागार नेमणे .

४) उच्चाधिकार समितीने दिलेल्या मान्यतेनुसार कामांच्या प्रशासकीय मान्यतेचे आदेश निर्गमित करणे.

५) आराखडयाच्या अंमलबजावणीसाठी कार्यान्वयीन यंत्रणांशी समन्वय साधणे.

६) आराखडयाच्या कामांचा मासिक आढावा घेणे.

७) आराखडयाची अंमलबजावणी विहीत कालावधीत पूर्ण होण्यासाठी आवश्यक ती सर्व उपयायोजना करणे.

८) सदर समितीला आवश्यकतेनुसार कार्यानुरुप विविध समित्या गठित करणे

९) कामाच्या निमित्ताने जिल्हास्तरावरील कोणत्याही अधिकाऱ्यास बोलविण्याचे व त्यांना योग्य त्या सूचना करण्याचे अधिकार जिल्हाधिकारी यांना राहतील.

१०) आराखडयाच्या अंमलबजावणीकरिता कोणत्याही प्रकारची नवीन पदे निर्माण करता येणार नाहीत. त्यामुळे कार्यालयीन व लेखाविषय कामांसाठी जिल्हास्तरावरील आवश्यक कर्मचारीवृंदाच्या सेवा अधिग्रहित करण्याचे अधिकार समितीस राहतील.

**इ)** अर्थसंकल्पीय भाषणात नमूद आंतरराष्ट्रीय / राष्ट्रीय दर्जाची महत्वाची स्थळे, तीर्थक्षेत्रे परिसर विकास आराखडे यांची व्याप्ती व स्वरुप लक्षात घेऊन, संबंधित आराखडे नियोजन विभागामार्फत राबविण्यात येतील. **नागरी /ग्रामीण क्षेत्रातील तीर्थक्षेत्रे व परिसर विकास आराखडे संबंधित नगर विकास / ग्राम विकास विभागातंर्गत राबविण्यात येतील. तसेच, पर्यटन स्थळे विकसित करण्याबाबतचे आराखडे पर्यटन विभागामार्फत राबविण्यात येतील.**

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६०४१५५७१८२११६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mugdha Nitin Dhuri

Digitally signed by Mugdha Nitin Dhuri
DN: CN = Mugdha Nitin Dhuri, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.06.04 15:59:15 +05'30'

**मु.नि.धुरी**
उप सचिव

**प्रत,**

१) सर्व सन्माननीय विधानसभा, विधानपरीषद सदस्य

२) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य,
३) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
४) सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालयीन विभाग
५) सर्व विभागीय आयुक्त
६) सर्व जिल्हाधिकारी
७) मा.मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव
८) सर्व मा. मंत्री/मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
९) अपर मुख्य सचिव (नियोजन) यांचे वरिष्ठ स्विय सहाय्यक
१०) निवड नस्ती का.१४४४